**घनसावंगी, जि. जालना येथे अल्पसंख्याक समाजातील विद्यार्थींनींकरिता वसतीगृहास फर्निचरसाठी निधी उपलब्ध करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
## शासन निर्णय क्रमांकः वसगृ-२०१४/प्र.क्र.७२/का.८

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १० डिसेंबर, २०१४.

वाचा -

**१) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग क्र. मौआम-२००९/ प्र.क्र.१५/का.८, दिनांक: ०२.०३.२०१०.**
**२) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग क्र. वसगृ-२०११/ प्र.क्र.१०५/का.८, दिनांक: ०१ नोव्हेंबर, २०११.**
**३) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग क्र. वसगृ-२०११/ प्र.क्र.१०५/का.८, दिनांक: २६ डिसेंबर, २०११.**
**४) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग क्र. वसगृ-२०१२/ प्र.क्र.११८/का.८, दिनांक: ०५ मार्च,२०१३.**
**५) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग क्र. वसगृ-२०१३/ प्र.क्र.११६/का.८, दिनांक: ०२ जानेवारी, २०१४.**
**६) शासन निर्णय क्रमांकः अल्पसंख्याक विकास विभाग क्र. वसगृ-२०११/ प्र.क्र.१०५/का.८, दिनांक: ३० जून, २०१४.**

प्रस्तावना -

अल्पसंख्याक समाजातील उच्च शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थीनीसाठी राज्यातील सर्व जिल्हयांमध्ये वसतीगृहे बांधण्याबाबतचा शासन निर्णय दिनांक २ मार्च, २०१० रोजी निर्गमित करण्यात आला आहे. शासन निर्णय दि.२६.१२.२०११ अन्वये घनसांवगी, जिल्हा जालना येथील अल्पसंख्याक समाजातील मुंलींच्या वसतीगृहास रु.४,३४,९८,२४०/- इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.तसेच शासन निर्णय दि.३०.०६.२०१४ अन्वये सदर बांधकामासाठी व फर्निचरसाठी येणाऱ्या रु.४,३४,९८,२४०/- इतक्या खर्चास व वसतीगृहाच्या फर्निचरसाठी रू.६४,९९,९७५/- अतिरिक्त खर्च अशा एकूण रू ४,९९,९८,२१५/- अंदाजपत्रकास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.कार्यकारी अभियंता,सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.२, जालना यांनी त्यांच्या दि. २६.०५.२०१४ च्या पत्रान्वये वसतीगृहाच्या फर्निचरसाठी निधी उपलब्ध करून देण्याची विनंती केली आहे. त्याअनुंषगाने निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय-

जालना जिल्हातील मौजे घनसांवगी येथील अल्पसंख्याक समाजातील मुंलींच्या वसतीगृहाच्या फर्निचरसाठी रु.६४,९९,९७५/- (अक्षरी रुपये चौसष्ट लाख नव्याण्णव हजार नऊशे पंच्चाहत्तर मात्र) इतकी तरतूद वितरीत करण्यास याव्दारे मान्यता देण्यात येत आहे.

सदर तरतूद जिल्हाधिकारी जालना यांचेकडे सुपूर्द करण्यात येत असून याकरिता संबधित जिल्हाधिकारी हे नियत्रंक अधिकारी आणि त्यांनी प्राधिकृत केलेले दुय्यम अधिकारी आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

जिल्हाधिकारी,जालना यांना सन २०१४-१५ करिता वरीलप्रमाणे मंजूर करण्यात आलेली एकूण रु.६४,९९,९७५/-(अक्षरी रुपये चौसष्ट लाख नव्याण्णव हजार नऊशे पंच्चाहत्तर मात्र) इतकी रक्कम अर्थसंकल्प वितरण प्रणालीतून आहरण व संवितरण करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

सदरचा खर्च करण्यास वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत C.V.C.च्या मार्गदर्शक तत्वानुसार /CAG च्या निदेशानुसार कोणताही शासन निर्णय/अटी व शर्तींचा भंग होणार नाही याची दक्षता संबधित जिल्हाधिकाऱ्यांनी घ्यावी.सदर रक्कम वितरीत करण्यापूर्वी संबंधित जिल्हाधिकारी यांनी शासनाने यासंदर्भात वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/कार्यालयीन आदेश/वित्तीय नियमावली/सार्वजनिक बांधकाम विभागाची कार्यनियमावली/भारताचे नियंत्रक व महालेखापरीक्षक यांचे निरीक्षण अहवाल /वित्तीय कार्यपध्दती यांचा अवलंब करावा.तसेच सदर रक्कम चालू आर्थिक वर्षात उपयोगात आणणे आवश्यक राहील.सदर निधी कोणत्याही संस्थेत ठेव स्वरूपात जमा करता येणार नाही.

. यावर होणारा खर्च मागणी क्रमांक झेडई-१,२२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २००- इतर कार्यकम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०८) शहरातील अल्पसख्याक समाजातील मुलींच्या वसतीगृहाकरिता सहाय्यक अनुदान, (२२३५ ए १४२) ३१- सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर ) या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा.

सदर निधीच्या विनियोगाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र संबधित जिल्हाधिकारी यांनी शासनास सादर करावे.

हा शासन निर्णय,नियोजन विभागाचे अनौपचारिक संदर्भ क्र. २९६/कार्या.१४७५ दि.१२.११.२०१४ व वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.९९५/१४/व्यय-४ दि.१९.११.२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२१०१६२८५९८९१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ainul Chand Attar

Digitally signed by Ainul Chand Attar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=MDD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ainul Chand Attar
Date: 2014.12.10 17:28:34 +05'30'

**( अैनुल अत्तार )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१.महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
२.महालेखापाल, महाराष्ट्र-२,(लेखा परीक्षा) नागपूर
३.सह संचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय भवन, ५ वा मजला, मुंबई
४.जिल्हाधिकारी, जालना
५.सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
६.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग नं.२, जालना
७.प्रमुख लिपिक, जिल्हाधिकारी कार्यालय, जालना
८.जिल्हा कोषागार अधिकारी, जालना
९.वित्त विभाग,(अर्थसंकल्प-१४, व्यय-४ ) मंत्रालय, मुंबई
१०.नियोजन विभाग, (कार्या.१४७५).
११.अवर सचिव (का.७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना विनंती करण्यात येते की त्यांनी कृपया उपरोक्त निधी B. D. S. प्रणालीवर संबधितांना उपलब्ध करून घ्यावा.
१२.निवड नस्ती